सांकेतिक क्रमांक - २०१४१२०११२५८४९८०२६

वरवंड लघु पाटबंधारे (संग्राहक) तलाव प्रकल्प, ता. जि. बुलढाणा या योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्र.लपायो२२०९/(४४३/०९)/लपा-२

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक १८.०४/२०१२

पहावे . कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे २४६/विपाविम/काता-७, दिनांक १३.१.२०११ चे पत्र.

**प्रस्तावना** :

वरवंड लघु पाटबंधारे (संग्राहक) तलाव प्रकल्प, ता. जि. बुलढाणा या योजनेस शासन निर्णय क्र.लपात-२२०६/(७९/२००६)/लपा-२, दिनांक २०.४.२००६ अन्वये एकुण अंदाजित खर्च रु.३८८.९१२ लक्ष या किंमतीस मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा मुळ प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करताना सन २००३-०४ च्या दरसुचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीमध्ये झालेली वाढ, भूसंपादनातील वाढ, संकल्पचित्र व अभियांत्रिकी फेरबदल,जास्त दराची निविदा स्विकृती, अनुषंगीक खर्च इत्यादी कारणांमुळे वाढ झाली असल्याने योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

**शासन निर्णय** :

शासन आता या निर्णयान्वये वरवंड लघु पाटबंधारे (संग्राहक) तलाव प्रकल्प, ता. जि. बुलढाणा या योजनेचा एकुण अंदाजित खर्च रु.१०४३.०३ लक्ष (रु.दहा कोटी, त्रेचाळीस लक्ष, तीन हजार फक्त) सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करीत आहे. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २००८-०९ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबतच्या परिशिष्टामध्ये जोडला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५,४७०२, लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च – पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-८० सर्वसाधारण १९०- सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (००) (०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०२ ५१० १) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

D:\Bawaskar\2012\Varvand.doc

ठळक बाबी

अ) योजनेची सिंचन क्षमता २५२ हे. आहे.

ब) योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा १७०४.८४ स.घ.मी.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु.६११८२/-

ड) लाभव्यय गुणोत्तर १.०१

हा निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच/१०७३/३२६५६/ (ई-३), दिनांक [illegible].७४ मधील परिशिष्ट क्र.२ (अ) नूसार व वित्त विभागाचे पत्र क्र. व्यअस-२०१२/प्र.क्र. ३७४/अर्थसं-२, दिनांक ३.१.२०१२ अन्वये व्यय अग्रक्रम समितीने दिलेल्या मंजूरीनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (१४/२०१२) अनुक्रमांकावर नोंदवण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प्र.र.कुलकर्णी)
शासनाचे अवर सचिव

प्रतिलिपी,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई ३२.
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प,जलसंपदा विभाग, अमरावती
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)
आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधीक्षक अभियंता अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला
कार्यकारी अभियंता, बुलढाणा प्रकल्प मंडळ, बुलढाणा
अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, बुलढाणा
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
लपा-२, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : लपायो २२०९/(४४३/०९)/लपा-२, दिनांक २४/०८/२०१२ चे परिशिष्ट

वरवंड लघु पाटबंधारे (संग्राहक) तलाव प्रकल्प, ता. जि. बुलढाणा उपशिर्षनिहाय तरतुदी

(रु.लक्ष)

| अ.क्र. | शिर्षे / उपशिर्षे | रक्कम |
|---|---|---|
| १ | अ- प्रारंभिक | ५.७३ |
| २ | बी- भुसंपादन | १६५.७७ |
| ३ | सी- मुख्य कामे | ७३४.५८ |
| ४ | डी- मुख्य विमोचक | २८.६४ |
| ५ | के- इमारत | १.२१ |
| ६ | ओ- संकीर्ण | १५.२६ |
| ७ | पी- देखभाल | ३.८१ |
| ८ | आर- दळणवळण | ८.२८ |
| | एकुण | ९६३.२८ |
| | अनुषांगिक खर्च | ७९.७५ |
| | एकूण रु. लक्ष | १०४३.०३ |